महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरण-२०२३.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. निर्यात -२०२३/ प्र.क्र. १३५/ उद्योग-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक २२/११/२०२३

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र हे देशातील औद्योगिकदृष्ट्या समृद्ध असे राज्य असून उद्योग, कृषी आणि सेवा क्षेत्राच्या निर्यातीच्या बाबतीत देशाच्या अर्थव्यवस्थेत राज्याची महत्त्वाची भूमिका आहे. देशाच्या सकल देशांतर्गत उत्पादनामध्ये १३.७% वाटा असलेले राज्य देशाच्या अर्थव्यवस्थेत सर्वात मोठे योगदान देणारे आहे. महाराष्ट्र हे देशाच्या निर्यातीत सर्वाधिक योगदान देणारे राज्य असून निर्यात प्रोत्साहन व व्यापार सुलभीकरण उपक्रमांद्वारे जागतिक व्यापारात राज्याचा वाटा सातत्याने वाढत आहे. सन २०२२-२३ या वित्तीय वर्षामध्ये महाराष्ट्र हे देशातील दुस-या क्रमांकाचे निर्यात करणारे राज्य असून देशातील एकूण निर्यातीपैकी १७% म्हणजेच रुपये ५.८१ लक्ष कोटी एवढी निर्यात राज्यातून झाली आहे. निती आयोगामार्फत जाहीर करण्यात आलेल्या निर्यात तत्परता निर्देशांकामध्ये (EPI) सन २०२० व २०२१ या वर्षात देशातील सर्व राज्ये व केंद्रशासित प्रदेशांमध्ये राज्याचा दुसरा क्रमांक आलेला आहे. माहे एप्रिल, २००० ते सप्टेंबर, २०२१ या कालावधीत महाराष्ट्रामध्ये US $ १३०.५७ अब्ज इतकी परकीय प्रत्यक्ष गुंतवणूक (FDI) झालेली आहे. ऑक्टोबर, २०१९ ते मार्च, २०२३ या कालावधीत देशात झालेल्या एकूण परकीय प्रत्यक्ष गुंतवणूक (FDI) पैकी राज्याचा वाटा २९% इतका असून परकीय प्रत्यक्ष गुंतवणूक आकर्षित करण्यामध्ये महाराष्ट्र हे देशात सर्वोच्च स्थानी आहे.

राज्यातील औद्योगिक परिसंस्था चांगल्याप्रकारे विकसित झालेली असून उद्योजकतेला चालना देण्यासाठी पोषक वातावरण तयार आहे. महाराष्ट्र हे देशातील सर्वात जास्त औद्योगिकरण झालेले राज्य असून राज्याच्या सर्वसमावेशक आर्थिक प्रगतीसाठी राज्याचे औद्योगिक धोरण हे दिनांक ०७/०३/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आले आहे राज्यातील उच्च तंत्रज्ञानयुक्त उदयोन्मुख क्षेत्रांतील उद्योगाला चालना देण्यासाठी, राज्याच्या औद्योगिक धोरणामध्ये १४ प्राधान्य क्षेत्रे (Thrust Sectors) निश्चित करण्यात आली आहेत. महाराष्ट्र सरकारने व्यवसाय सुलभता (EoDB), निर्यात प्रोत्साहन, धोरणे, दर्जेदार पायाभूत सुविधा आणि कुशल मनुष्यबळ यासाठी अनेक उपक्रम हाती घेतले आहेत ज्यामुळे राज्य अभियांत्रिकी, ऑटोमोबाईल्स आणि ऑटो घटक, रसायने, रत्ने आणि दागिने, फार्मास्युटिकल्स, IT, कृषी, अन्न प्रक्रिया, वस्त्र, इलेक्ट्रॉनिक्स आणि जैवतंत्रज्ञान यासारख्या विविध क्षेत्रांमध्ये आघाडीवर आहे.

राज्यामध्ये निर्यात क्षेत्रास व उत्पादन क्षेत्रास प्रोत्साहन देण्यासाठी तसेच रोजगार निर्मितीचे लक्ष्य साध्य करण्यासाठी आणि निर्यातवाढीकरीता प्रत्येक जिल्ह्याला उत्तरदायी बनवण्यासाठी राज्याकडून केंद्र शासनाच्या जिल्हा हे निर्यात केंद्र (Districts as Export Hubs) उपक्रमाला प्रोत्साहन देण्यात येत आहे. राज्यामध्ये व्यापार प्रचालनासाठी व जागतिक निर्यातीमध्ये राज्याचे स्थान बळकट करण्यासाठी नोडल विभाग म्हणून उद्योग विभागामार्फत निर्यात प्रचालनासाठी विविध उपक्रम हाती घेण्यात येत आहेत. त्यापैकीच एक उपक्रम म्हणजे एक जिल्हा एक उत्पादन (ODOP - One District One Product) होय.

महाराष्ट्र आर्थिक सल्लागार समिती-२०२३ च्या अहवालानुसार, सन २०२८ पर्यंत राज्याची अर्थव्यवस्था US $ १ ट्रिलियन एवढी साध्य करण्याकरीता उद्दीष्ट निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार सन २०२८ पर्यंत उत्पादन क्षेत्राच्या ढोबळ मूल्यामधील वाढ (Gross Value Added) ३ पटीने म्हणजेच US $ १८२ अब्ज इतकी साध्य होण्यासाठी, राज्यातील लक्षांकित उद्योग निश्चित करून त्यामध्ये गुंतवणूक

आकर्षित करण्याकरीता, पायाभूत सुविधांचा विकास करण्याची आवश्यकता अधोरेखीत केली आहे. तसेच केंद्र शासनाने निश्चित केल्यानुसार, सन २०५० पर्यंत देशाची अर्थव्यवस्था US $ ३० ट्रिलियन साध्य करण्याच्या अनुषंगाने, राज्यातील निर्यात क्षेत्राला गती देण्यासाठी तसेच राज्यामध्ये थेट परकीय गुंतवणूक (FDI) आकर्षित करण्यासाठी महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरण जाहीर करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय</u>:-**

राज्याची निर्यात क्षेत्रातील कामगिरी वाढवून सन २०२८ पर्यंत राज्याची अर्थव्यवस्था US $ १ ट्रिलियन एवढी साध्य करण्याकरीता राज्यामध्ये निर्यात प्रोत्साहन विषयक पायाभूत सुविधांची निर्मिती व बळकटीकरण करणे, निर्यातदार तसेच निर्यातक्षम घटकासाठी निवडक प्रोत्साहने देणे, निर्यातवृध्दीसाठी ODOP व GI उत्पादनांना प्रोत्साहन देणे, निर्यात सुविधांकरीता संस्थात्मक उभारणी करणे, निर्यात सुलभीकरणासाठी पुढाकार (Ease of Doing Exports) घेणे तसेच निर्यात प्रोत्साहनाकरीता राज्य शासनाच्या इतर धोरणांचे अभिसरण करणे या घटकांवर विशेष भर देणे आवश्यक आहे. या सर्व बाबी साकल्याने विचारात घेऊन सर्वसमावेशक असे महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरण-२०२३ या तयार करण्यात आले असून राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक ०८/११/२०२३ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत त्यावर सखोल व सविस्तर चर्चा करून त्यास मान्यता देण्यात आली. त्यानुसार महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरण-२०२३ यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरण-२०२३ मराठी “परिशिष्ट-१” व इंग्रजी “परिशिष्ट-२” सोबत जोडले आहे. तसेच सदर धोरणाच्या अनुषंगाने मा. मंत्रिमंडळाकडून पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आले :-

i. महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरण-२०२३ अंतर्गत पायाभूत सुविधा प्रकल्प राबविण्याकरीता (कार्यक्रम खर्च) तसेच राज्य शासनाकडून द्यावयाच्या निर्यात प्रोत्साहनांकरीता (अनिवार्य खर्च) या बाबींतर्गत नवीन दोन स्वतंत्र लेखाशिर्ष निर्माण करून प्रस्तुत धोरणाच्या अंमलबजावणीसाठी रुपये ४,२५० कोटी एवढी तरतूद धोरण कालावधीत उपलब्ध करून देण्यास मान्यता प्रदान करण्यात आली.

ii. चालू आर्थिक वर्ष सन २०२३-२४ करीता सदर धोरणांतर्गत अनिवार्य खर्चाकरीता नवीन स्वतंत्र लेखाशिर्ष उघडून रुपये ५० कोटी इतका अतिरिक्त निधी उपलब्ध करून विहित कार्यपद्धतीनुसार वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली.

iii. सदर धोरणाच्या अंमलबजावणीसाठी आगामी आर्थिक वर्षापासून (सन २०२४-२५) अनुक्रमांक २ येथे नमूद दोन स्वतंत्र लेखाशिर्षाद्वारे कार्यक्रम खर्चाकरीता अतिरिक्त रुपये ४५० कोटी व अनिवार्य खर्चाकरीता अतिरिक्त रुपये ४०० कोटी वार्षिक तरतूद उपलब्ध करून देण्यास मान्यता प्रदान करण्यात आली.

iv. प्रस्तुत धोरणांतर्गत विकसीत करण्यात येणाऱ्या एकूण १५ निर्यातीभिमूख औद्योगिक उद्यान (Export oriented Industrial Parks) प्रकल्पांपैकी ३ प्रकल्प हे कोकण विभागातील “बंदर परिक्षेत्रा” मध्ये विकसीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली.

v. केंद्र शासनाकडून PLI (Production Linked Incentives) योजनेंतर्गत निश्चित करण्यात आलेल्या १४ प्रकारच्या उद्योग संवर्गाव्यतिरिक्त -फर्निचर उत्पादन॰ या उद्योग संवर्गातील निर्यातक्षम घटकांना सदर धोरणांतर्गत विशेष प्रोत्साहने देण्यास मान्यता प्रदान करण्यात आली.

vi. महाराष्ट्र समृध्दी महामार्गालगत १० नोड निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रमांतर्गत (EoIDP) विकसीत करण्याकरीता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने जमीन विनामूल्यरित्या/ संयुक्त उपक्रमाद्वारे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास हस्तांतरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली.

२. सदर शासन निर्णय दिनांक ०८/११/२०२३ रोजी मा. मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३११२२१७४९०२५८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY SHAMKANT DEGAONKAR

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=56CF8C8577584ADC42F070185C585C41084CC34F6683553D21CCACBFA33D4D1F, cn=SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2023.11.24 15:53:08 +05'30'

**(संजय देगांवकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
५. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. अपर मुख्य सचिव, सहकार व पणन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव, नगरविकास विभाग-१, मंत्रालय, मुंबई-३२.
९. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, ऊर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. प्रधान सचिव, परिवहन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. प्रधान सचिव, वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१४. सचिव, मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१५. मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
१६. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालयासमोर, मुंबई.
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी (पूर्व), मुंबई.
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई.
१९. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२०. मा. अध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई यांचे खाजगी सचिव
२१. मा. सभापती, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई यांचे खाजगी सचिव
२२. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई यांचे खाजगी सचिव
२३. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई यांचे खाजगी सचिव
२४. उद्योग विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/कक्ष अधिकारी.
२५. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२६. निवड नस्ती (उद्योग-७), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

# परिशिष्ट- १

**महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरण-२०२३ (शासन निर्णय उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग क्र. निर्यात -२०२३/प्र.क्र. १३५/उ-७,दिनांक २२/११/२०२३ सोबतचे सहपत्र)**

## १. प्रस्तावना:-

जागतिक स्तरावर निर्यात क्षेत्राला आर्थिक विकास आणि वाढीचे इंजिन म्हणून ओळखले जाते. राज्याचा आर्थिक विकास आणि वाढ होण्यासाठी महाराष्ट्र शासनाने निर्यातीला प्राधान्य दिले आहे. केंद्र शासनाने निश्चित केल्यानुसार, सन २०५० पर्यंत देशाची अर्थव्यवस्था US $ ३० ट्रिलियन साध्य करण्याच्या अनुषंगाने, राज्यातील निर्यात क्षेत्राला गती देण्यासाठी तसेच राज्यामध्ये थेट परकीय गुंतवणूक (FDI) आकर्षित करण्यासाठी राज्याचे निर्यात प्रोत्साहन धोरण जाहीर करण्याचे प्रस्तावित आहे.

महाराष्ट्र हे भारताच्या निर्यातीत सर्वाधिक योगदान देणारे राज्य असून निर्यात प्रोत्साहन व व्यापार सुलभीकरण उपक्रमांद्वारे जागतिक व्यापारात राज्याचा वाटा सातत्याने वाढत आहे. सन २०२२-२३ या वित्तीय वर्षामध्ये महाराष्ट्र हे देशातील दुस-या क्रमांकाचे निर्यात करणारे राज्य असून देशातील एकूण निर्यातीपैकी १७% म्हणजेच रुपये ५.८१ लक्ष कोटी एवढी निर्यात राज्यातून झाली आहे. राज्यातून सर्वाधिक आयात करणा-या प्रथम १० देशांमध्ये USA, UAE, हाँगकाँग, बेल्जियम, UK, चिन, सिंगापूर, नेदरलँड, जर्मनी आणि बांग्लादेश यांचा क्रमांक लागतो. निती आयोगामार्फत जाहीर करण्यात आलेल्या निर्यात तत्परता निर्देशांकामध्ये (EPI) सन २०२० व २०२१ या वर्षात देशातील सर्व राज्ये व केंद्रशासित प्रदेशांमध्ये राज्याचा दुसरा क्रमांक आलेला आहे.

महाराष्ट्र हे भारतातील औद्योगिकदृष्ट्या समृद्ध असे राज्य असून उद्योग, कृषी आणि सेवा क्षेत्राच्या निर्यातीच्या बाबतीत देशाच्या अर्थव्यवस्थेत राज्याची महत्त्वाची भूमिका आहे. देशाच्या सकल देशांतर्गत उत्पादनामध्ये १३.७% वाटा असलेले राज्य देशाच्या अर्थव्यवस्थेत सर्वात मोठे योगदान देणारे आहे. राज्याची अर्थव्यवस्था ही देशातील सर्वात मोठी अर्थव्यवस्था असून सन २०२०-२१ या वित्तीय वर्षामध्ये सकल राज्य देशांतर्गत उत्पादन (GSDP) US $ ४३०.६२ अब्ज आणि दरडोई सकल राज्य देशांतर्गत उत्पादन US $ २,६४५ इतके आहे.

महाराष्ट्र आर्थिक सल्लागार समिती-२०२३ च्या अहवालानुसार, सन २०२८ पर्यंत राज्याची अर्थव्यवस्था US $ १ ट्रिलियन एवढी साध्य करण्याकरीता उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार सन २०२८ पर्यंत उत्पादन क्षेत्राच्या ढोबळ मूल्यामधील वाढ (Gross Value Added) ३ पटीने म्हणजेच US $ १८२ अब्ज इतकी साध्य होण्यासाठी, राज्यातील लक्षांकित उद्योग निश्चित करून त्यामध्ये गुंतवणूक आकर्षित करण्याकरीता, पायाभूत सुविधांचा विकास करण्याची आवश्यकता अधोरेखीत केली आहे. तसेच केंद्र शासनाने निश्चित केल्यानुसार, सन २०५० पर्यंत देशाची अर्थव्यवस्था US $ ३० ट्रिलियन साध्य करण्याच्या अनुषंगाने, राज्यातील निर्यात क्षेत्राला गती देण्यासाठी तसेच राज्यामध्ये थेट परकीय गुंतवणूक (FDI) आकर्षित करण्यासाठी राज्याचे निर्यात प्रोत्साहन धोरण जाहीर करण्याचे प्रस्तावित आहे.

माहे एप्रिल, २००० ते सप्टेंबर, २०२१ या कालावधीत महाराष्ट्रामध्ये US $ १३०.५७ अब्ज इतकी परकीय प्रत्यक्ष गुंतवणूक (FDI) झालेली आहे. ऑक्टोबर, २०१९ ते मार्च, २०२३ या कालावधीत देशात झालेल्या एकूण परकीय प्रत्यक्ष गुंतवणूक (FDI) पैकी राज्यामध्ये USD $ ५३.९७१ अब्ज म्हणजेच देशाच्या २९% इतका वाटा असून परकीय प्रत्यक्ष गुंतवणूक आकर्षित करण्यामध्ये महाराष्ट्र हे देशात सर्वोच्च स्थानी आहे. थेट परकीय गुंतवणूकीमध्ये अन्न प्रक्रिया, स्वयंचलित वाहने, रसायने, औषधीद्रव्य, धातू उद्योग, इलेक्ट्रिकल उपकरणे, वस्त्रोद्योग, इलेक्ट्रॉनिक्स इत्यादीं उद्योगाचा समावेश आहे. राज्याचे प्रस्तावित निर्यात प्रोत्साहन धोरण आणि त्यामधील तरतूदींमुळे राज्यात परकीय प्रत्यक्ष गुंतवणूक होण्यास आणखी चालना मिळणार आहे.

राज्यातील औद्योगिक परिसंस्था चांगल्याप्रकारे विकसित झालेली असून उद्योजकतेला चालना देण्यासाठी पोषक वातावरण तयार आहे. महाराष्ट्र हे देशातील सर्वात जास्त औद्योगिकरण झालेले राज्य असून राज्याच्या सर्वसमावेशक आर्थिक प्रगतीसाठी राज्याचे औद्योगिक धोरण हे दिनांक ०७/०३/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये

घोषित करण्यात आले आहे राज्यातील उच्च तंत्रज्ञानयुक्त उदयोन्मुख क्षेत्रांतील उद्योगाला चालना देण्यासाठी, राज्याच्या औद्योगिक धोरणामध्ये १४ प्राधान्य क्षेत्रे (Thrust Sectors) निश्चित करण्यात आली आहेत. महाराष्ट्र सरकारने व्यवसाय सुलभता (EoDB), निर्यात प्रोत्साहन, धोरणे, दर्जेदार पायाभूत सुविधा आणि कुशल मनुष्यबळ यासाठी अनेक उपक्रम हाती घेतले आहेत ज्यामुळे राज्य अभियांत्रिकी, ऑटोमोबाईल्स आणि ऑटो घटक, रसायने, रत्ने आणि दागिने, फार्मास्युटिकल्स, IT, कृषी, अन्न प्रक्रिया, वस्त्र, इलेक्ट्रॉनिक्स आणि जैवतंत्रज्ञान यासारख्या विविध क्षेत्रांमध्ये आघाडीवर आहे.

राज्यामध्ये निर्यात क्षेत्रास व उत्पादन क्षेत्रास प्रोत्साहन देण्यासाठी तसेच रोजगार निर्मितीचे लक्ष्य साध्य करण्यासाठी आणि निर्यातवाढीकरीता प्रत्येक जिल्ह्याला उत्तरदायी बनवण्यासाठी राज्याकडून केंद्र शासनाच्या जिल्हा हे निर्यात केंद्र (Districts as Export Hubs) उपक्रमाला प्रोत्साहन देण्यात येत आहे. राज्यामध्ये जिल्हावार ३५ भौगोलिक संकेत (GI) उत्पादने आणि ७२ ODOP उत्पादने निश्चित करण्यात आलेली आहेत. भौगोलिक मानांकन (GI) उत्पादन नोंदणीमध्ये राज्य देशात ५ व्या क्रमांकावर आहे.

जागतिक बाजारपेठेतील संधींचा फायदा घेणे, राज्याच्या संसाधनांचा पुरेपुर वापर करणे आणि निर्यातीसाठी अनुकूल वातावरण निर्माण करण्यासाठी राज्य शासनाकडून महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरण प्रस्तावित करण्यात येत आहे.

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र राज्य हे रूपये ५.८१ लाख कोटी निर्यातीसह भारतातील दुसऱ्या क्रमाकांचे सर्वाधिक निर्यात करणारे राज्य असून,त्याचा वाटा १७% इतका आहे. २०२० आणि २०२१ निर्यात सज्जता निर्देशांकामध्ये (EPI) सर्व राज्ये आणि केंद्रशासित प्रदेशांमध्ये राज्य हे दुसऱ्या क्रमांकावर असून, निती आयोगाने प्रकाशित केलेल्या धोरण आणि निर्यात परिसंस्थेच्या मापदंडांमध्ये सर्वोच्च स्थानावर आहे.

राज्यातून होणा-या एकूण निर्यात मूल्यापैकी ९२% निर्यात मूल्य हे मुंबई उपनगर (२१%), मुंबई (२०%), पुणे (१७%), ठाणे (८%), रायगड (७%), पालघर (५%), औरंगाबाद (४%), नाशिक (४%), नागपूर (२%) व सातारा (२%) या दहा जिल्ह्यांतून मिळते. राज्याच्या एकूण निर्यातीतील वाटा हा प्रामुख्याने जेम्स व ज्वेलरी (२८%), इंजिनिरींग (२३%), कृषी व संलग्न क्षेत्रे (१४%), रसायने (१०%), लोह व पोलाद (७%), फार्मास्युटीकल्स (५%), इलेक्ट्रॉनिक्स व इलेक्ट्रीकल कॉम्पोनंटस् (५%), टेक्स्टाईल व ॲपेरल(४%), प्लॅस्टीक उत्पादने (२%) आणि पेट्रोलियम उत्पादने, खाणी व खनिजे (२%) या दहा क्षेत्रांचा आहे.

राज्यामध्ये विविध क्षेत्रातील निर्यातवृध्दीकरीता ३७ विशेष आर्थिक क्षेत्र (Special Economic Zone), ८ कृषी निर्यात क्षेत्र (Agro Economic Zone) आणि २७ औद्योगिक पार्क स्थापित झाले असून राज्यामध्ये व्यापार प्रचालनासाठी व जागतिक निर्यातीमध्ये राज्याचे स्थान बळकट करण्यासाठी नोडल विभाग म्हणून उद्योग विभागामार्फत निर्यात प्रचालनासाठी विविध उपक्रम हाती घेण्यात येत आहेत. त्यापैकी काही उपक्रम एक जिल्हा एक उत्पादन (ODOP - One District One Product), जिल्हा हेच निर्यात हब (District as Export Hub), राज्य निर्यात प्रोत्साहन परिषद इत्यादी होय.

**२. <u>उद्दिष्ट, लक्षांक, लक्षांकित क्षेत्रे आणि धोरण कालावधी</u> :-**

**२.१. धोरणाचे उद्दिष्ट :**

राज्याची आर्थिक वाढ साध्य करण्यासाठी तसेच रोजगाराच्या संधी निर्माण करण्यासाठी खालील उद्दिष्टे निश्चित करण्यात आली आहेत:-

- जागतिक मूल्य साखळीमध्ये राज्याचा सहभाग वाढविणे.
- राज्याचा शाश्वत विकास साध्य करण्यासाठी अस्तित्वातील प्राधान्य क्षेत्रे तसेच सूक्ष्म,लघु व मध्यम उपक्रमांच्या निर्यात क्षमतेचा पुरेपूर वापर करुन निर्यातीमध्ये वैविध्य साध्य करणे.
- राज्यातील शेतकऱ्यांना केंद्र बिंदू समजून त्यांच्या दरडोई उत्पन्न वाढीकरीता समृध्दी महामार्ग लगतच्या कृषी समृध्दी केंद्रामध्ये अणुप्रक्रिया आधारीत निर्यात क्षम अन्न प्रक्रिया/कृषी प्रक्रिया उद्योग

उभारणीकरीता चालना देणे.

- नवीन बाजारपेठा/देश, नवीन निर्यात संभाव्य उत्पादने आणि जिल्ह्यांतील निर्यातक्षम उद्योजक शोधून निर्यातीत विविधता आणणे.
- राज्याच्या प्रादेशिकदृष्ट्या संतुलित विकासासाठी राज्यातील प्रत्येक जिल्ह्याचे निर्यातीतील योगदान वाढवून जिल्हा हेच निर्यात केंद्र (Districts as Export Hub ) म्हणून विकसित करणे.

**२.२ धोरणाचे लक्षांक :-**

- धोरण कालावधीमध्ये सन २०२७-२८ पर्यंत राज्याचे निर्यातीचे मूल्य सध्याच्या US $ ७२ अब्ज वरून US $ १५० अब्ज इतके वाढविणे.
- राज्यामध्ये पुढील पाच वर्षामध्ये ३० निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प (Export oriented Infrastructure Development Project - EoIDP) विकसित करणे.
- सन २०३० पर्यंत देशाच्या $ १ ट्रिलियन निर्यातीच्या उद्दीष्टात राज्याचा सहभाग एकूण २२% एवढा साध्य करणे.

**२.३ लक्षांकित क्षेत्रे :-**

- राज्यामध्ये राज्य शासनाच्या सहाय्याने सार्वजनिक-खाजगी भागीदारी (PPP) तत्त्वांतर्गत खाजगी गुंतवणूकीतून निर्यातीसाठी प्रोत्साहन ठरणा-या अत्याधुनिक पायाभूत सुविधांचा विकास करणे.
- जागतिक बाजारपेठेतील राज्याच्या निर्यातदारांचा सहभाग वाढविण्यासाठी, इतर देशांशी व्यापार करार (Trade agreements) करणे, आंतरराष्ट्रीय व्यापार मेळयांमध्ये भाग घेणे आणि निर्यातीसंबंधी अत्याधुनिक पायाभूत सुविधा प्रदान करणे.
- निर्यातक्षम MSMEs, नावीन्यपूर्ण संकल्पना आणि जागतिक स्पर्धात्मक तंत्रज्ञान यामध्ये वाढविण्यासाठी तसेच जागतिक पुरवठा साखळीमध्ये वापरण्यात येणारी आंतरराष्ट्रीय बेंचमार्कस् व गुणवत्ता मानके अवलंबण्यासाठी राज्यातील MSME क्षेत्र केंद्रीत निर्यातीसंदर्भातच्या पुढाकारांना लाभ देणे.
- निर्यात प्रोत्साहन परिषदा (EPC) तसेच व्यापार प्रोत्साहन यंत्रणा (TPA) यांच्या सहकार्याने राज्यातील निर्यातदारांना संस्थात्मक सहाय्य आणि त्यांची क्षमता बांधणी करून निर्यातक्षम व्यापाराला बळकटी देण्यासाठी राज्यामध्ये पोषक वातावरण तयार करणे.
- सद्यस्थितीतील संस्थात्मक रचना तसेच डिजीटल माध्यमातून एकल खिडकीद्वारे द्यावयाच्या परवानग्या याचे बळकटीकरण करून निर्यातीकरीता सुलभता (Ease of Doing Export) प्रदान करणे.

**२.४ धोरण कालावधी :**

हे धोरण अस्तित्वात आल्याच्या दिनांकापासून पाच वर्षांसाठी किंवा पुढील धोरण जाहीर होईपर्यंत लागू राहील. या धोरणाचे मूल्यमापन करण्यासाठी धोरण कालावधीत दर दोन वर्षांनी धोरणाचा आढावा घेण्यात येईल.

**३. <u>महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरणाचे प्रमुख घटक</u> :-**

I. निर्यात प्रोत्साहन विषयक पायाभूत सुविधांची निर्मिती व बळकटीकरण
II. निर्यातदार तसेच निर्यातक्षम घटकासाठी दिली जाणारी विशेष प्रोत्साहने
III. निर्यातवृध्दीसाठी ODOP व GI उत्पादनांना प्रोत्साहन देणे
IV. निर्यात सुविधांकरीता संस्थात्मक उभारणी
V. निर्यात सुलभीकरणासाठी पुढाकार (Ease of Doing Exports)
VI. निर्यात प्रोत्साहनाकरीता राज्य शासनाच्या इतर धोरणांचे अभिसरण
VII. मा. मंत्री (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली कार्यरत राज्य निर्यात प्रचालन परिषद

४. **निर्यात प्रोत्साहन विषयक पायाभूत सुविधांची निर्मिती व बळकटीकरण** :-

जागतिक बाजारपेठेत देशाची स्पर्धात्मकता वाढवण्यासाठी आणि आंतरराष्ट्रीय व्यापाराला चालना देण्यासाठी निर्यातीशी निगडीत पायाभूत सुविधा उभारणे महत्त्वाचे आहे. याव्यतिरिक्त, आधुनिक व्यापाराशी संबंधित पायाभूत सुविधा व्यवसायांना नवीन बाजार संधींचा फायदा घेण्यास, त्यांची ग्राहकसंख्या वाढविण्यास आणि आर्थिक वाढीस चालना देण्यास सक्षम करतात. या बाबी विचारात घेऊन, केंद्र शासनाच्या वाणिज्य विभागाने सन २००२ पासून ASIDE (Assistance to States for Infrastructure Development of Exports) (ASIDE) ही योजना सुरू केली. तद्नंतर सन २०१२ मध्ये सदर योजनेमध्ये सुधारणा करण्यात आल्या. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून राज्यांना निधी देण्यात येत होता. सदर योजनेकरीता पुरविण्यात येणारा निधी केंद्र शासनाने सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पापासून खंडीत केला. ASIDE योजनेतंर्गत केंद्र शासनाकडून निर्यातीला चालना देणाऱ्या पायाभूत सुविधांचा विकास, बळकटीकरण, पुरक सुविधा आणि निर्यात प्रोत्साहनाशी निगडीत प्रकल्पांसाठी ५०% अनुदान स्वरूपात आर्थिक सहाय्य राज्यांना देण्यात येत होते. राज्यातील निर्यात पूरक पायाभूत सुविधांच्या विकास कामासाठी निधी उपलब्ध करण्याकरीता अर्थसंकल्पीय तरतूद करण्याविषयी केंद्र शासनाने दिनांक २ जून, २०१५ च्या पत्राद्वारे सूचित केल्याने ASIDE योजनेच्या धर्तीवर राज्याची निर्यातीसाठीची प्रोत्साहन योजना अंमलात आणणे गरजेचे आहे.

केंद्र शासनाने आर्थिक सक्षमता, देशांतर्गत आणि परदेशी कंपन्यांच्या गुंतवणुकीला प्रोत्साहन देण्यासाठी आणि निर्यात वाढवण्यासाठी विशेष आर्थिक क्षेत्र (SEZ) संकल्पना सन २००५ च्या विशेष आर्थिक क्षेत्र कायद्याद्वारे अंमलात आणली. त्याद्वारे मान्यता प्राप्त SEZ आणि त्यामध्ये स्थापन केलेल्या उद्योग घटकांना आकर्षक वित्तीय पॅकेजेस, विकासक आणि घटकांसाठी थेट कर सवलत इत्यादी सहाय्य देण्यात आले. केंद्र शासनाने विशेष आर्थिक क्षेत्रासाठी सनसेट क्लॉज लागू करून विकासक आणि घटकांसाठी सर्व प्रत्यक्ष कर सवलती टप्प्याटप्प्याने काढून टाकल्या आहेत. निर्यातीला चालना देण्यासाठी, विशेष आर्थिक क्षेत्राऐवजी विशेष विकास हब झोन विकसित करण्याचे केंद्र शासनाद्वारे प्रस्तावित आहे. या उद्देशासाठी, डेवलपमेंट ऑफ एंटरप्राइजेस अँड सर्व्हिसेस हब (DESH) विधेयकाचा मसुदा संसदेमध्ये मांडण्यात आला आहे.

सकल राष्ट्रीय उत्पन्नाच्या बाबतीत महाराष्ट्र हे देशातील आघाडीचे राज्य असून देशाच्या एकूण निर्यातीत १७ टक्के वाटा देत आहे, आणि यास आणखी गती देण्यासाठी राज्य शासनाकडून अनेक उपाययोजना करण्यात येत आहेत. राज्यातून सन २०२२-२३ मध्ये ७२ अब्ज डॉलरची निर्यात (आत्तापर्यंतची सर्वाधिक) नोंदविली गेली आहे. निर्यातीस अधिकाधिक चालना देऊन सन २०२८ पर्यंत १ ट्रिलियन डॉलर अर्थव्यवस्था साध्य करण्याचे उद्दिष्ट राज्याने ठेवले आहे. आर्थिक विकासाला चालना देण्यासाठी निर्यात क्षेत्रामध्ये उपलब्ध विविध संधी लक्षात घेऊन निर्यात प्रोत्साहन व विशिष्ट क्षेत्र वाढीसाठी धोरणात्मक निर्णय यावर राज्य शासनाचे लक्ष केंद्रीत आहे. निर्यातीला चालना देण्यासाठी राज्याने निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रम (EoIDP) हा महत्त्वाकांक्षी उपक्रम राबविण्याचे योजिले आहे.

केंद्र शासनाकडून उद्योगांनी आधुनिक तंत्रज्ञानाचा अवलंब करून जागतिक बाजारपेठेत स्पर्धात्मकता वाढविण्यासाठी तंत्रज्ञान अद्ययावतीकरण कार्यक्रमांतर्गत (Technology Upgradation Programme) सहाय्य देते. केंद्र शासनाचे परकीय व्यापार धोरण (FTP) २०२३ मध्ये निर्यात कामगिरीला प्रोत्साहन देणे, जिल्हा हे निर्यात केंद्र म्हणून विकसित करणे आणि व्यापार सुलभीकरण यांचे महत्त्व अधोरेखित करण्यात आले आहे. सन २०३० पर्यंत १ ट्रिलियन डॉलर व्यापारी मालाच्या निर्यातीचे उद्दिष्ट साध्य करणे आणि भारतीय रुपया हे जागतिक चलन बनविण्याच्या दृष्टीने कार्य करण्याचे उद्दिष्ट परकीय व्यापार धोरणान्वये निश्चित करण्यात आले आहे.

"SEZ" आणि "ASIDE" योजना खंडीत झाल्याने तसेच निर्यात वाढीसाठी केंद्र शासनाकडून चालू विविध उपक्रम विचारात घेता, निर्यात क्षेत्र वाढीकरीता आवश्यक पायाभूत सुविधा उभारण्याकरीता पूरक योजना राज्य शासनाकडून सुरू करण्याची आवश्यकता जाणवली. त्याकरीता राज्य शासनामार्फत एक समर्पित लेखाशिर्ष निर्माण करून अर्थसंकल्पीय तरतुदीद्वारे निधी पुरविण्यात येईल. या पार्श्वभूमीवर मा. मुख्यमंत्री महोदय यांच्या

अध्यक्षतेखाली दिनांक १५ फेब्रुवारी २०२३ रोजी एक बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये ASIDE योजनेतंर्गत सादर करण्यात आलेल्या प्रकल्पांना सहाय्य देण्याच्या मुद्यांवर चर्चा करण्यात आली. तथापि, ASIDE योजना खंडीत होऊन अर्थसहाय्य उपलब्ध नसल्याने, प्रस्तावित केलेल्या प्रकल्पांना अर्थसहाय्य करणे शक्य झाले नाही. या पार्श्वभूमीवर मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली संपन्न बैठकीत, ASIDE च्या धर्तीवर, कृषी आणि अन्न प्रक्रिया क्षेत्रावर विशेष भर देणारी तसेच शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करणे आणि शेती उत्पादनाची नासाडी कमी करणे याला प्राधान्य देणारी राज्याची योजना आणण्याचा निर्णय घेतला. त्याअनुषंगाने निर्यातीला चालना देण्यासाठी जागतिक दर्जाच्या पायाभूत सुविधा उभारून तसेच निर्यातीसाठी सर्वोत्तम परिसंस्था तयार करून राज्याच्या निर्यात क्षमता वृद्धीसाठी निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रम (EoIDP) प्रस्तावित आहे.

**४.१ निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रम (Export oriented Infrastructure Development Programme - EoIDP) :-**

सदर कार्यक्रमांतर्गत राज्यामध्ये नवीन निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प निर्माण होण्याकरीता राज्य शासनाकडून सहाय्य करण्यात येणार आहे. या पुढाकारामुळे राज्याचा निर्यात क्षेत्रातील वाटा वाढण्यास मदत होणार असून सन २०२८ पर्यंत राज्याची अर्थव्यवस्था US $१ ट्रिलियन एवढी साध्य होण्यास मदत होणार आहे. सदर कार्यक्रम हा राज्य शासनाचा महत्त्वांकाक्षी कार्यक्रम राहणार असून सन २०३० पर्यंत देशाच्या $1 ट्रिलियन निर्यातीमध्ये राज्याचा सहभाग एकूण %२२एवढा करण्याचे त्याचे उद्दिष्ट राहणार आहे.

महाराष्ट्र आर्थिक सल्लागार समिती-२०२३ च्या अहवालामध्ये नमूद केल्यानुसार, राज्याच्या विविध क्षेत्रातील क्षमता विचारात घेऊन उद्योग विभागाकडून राज्यातील निर्यातीभिमूख विकास क्षेत्रांची निश्चिती करण्यात आली आहे. सदर क्षेत्रांच्या भरभराटीकरीता आवश्यक असणारे निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प हे कार्यक्षम लॉजिस्टिक आणि सुलभ दळणवळणाच्या दृष्टीने स्थापित करावयाचे असून ते प्रामुख्याने राज्यातील भौगोलिकदृष्ट्या विभिन्न (distinct) असलेल्या बंदरे, ड्राय पोर्टस् वा विमानतळे यामध्ये तसेच औद्योगिक कॉरीडोरच्या लगत उभारण्यात येणार आहेत.

**निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रमाकरीता (EoIDP) सूचक यादी (Indicative List) :-**

**a)** महाराष्ट्र समृद्धी महामार्ग औद्योगिक कॉरिडॉर म्हणजेच नागपूर-मुंबई द्रुतगती मार्गावरील कृषी व अन्न प्रक्रियावर विशेष भर असणारी तसेच ODOP उपक्रमांतर्गत समाविष्ट जिल्हे, औद्योगिक क्लस्टर्स, GI उत्पादने आणि निर्यात क्षमता असणाऱ्या औद्योगिक क्षेत्रांवर आधारीत निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प स्थापित करण्यात येतील.

**b)** जेम्स अँड ज्वेलरी क्षेत्रात अग्रेसर असलेल्या राज्यातील ठिकाणी निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प स्थापित करण्यात येतील.

**c)** वैद्यकीय तंत्रज्ञान उद्योजकतेला चालना देण्यासाठी क्षमता असलेल्या मेडीकल हबच्या ठिकाणी वैद्यकीय तंत्रज्ञान आधारीत निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प स्थापित करण्यात येतील.

**d)** राज्यातील किनारी क्षेत्र तसेच मत्स्यउत्पादनात अग्रेसर असलेल्या जिल्ह्यांमध्ये सागरी आणि ॲक्वा फूड प्रक्रिया आधारीत निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प स्थापित करण्यात येतील.

**e)** वस्त्र, कापूस, कापड उत्पादन, प्रक्रिया यामध्ये गुंतलेली जिल्हे तसेच गारमेंट समूहामध्ये निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प स्थापित करण्यात येतील.

**f)** इलेक्ट्रॉनिक्स सिस्टीम डिझाईन आणि मॅन्युफॅक्चरिंग (ESDM) अंतर्गत उत्तम परिसंस्था आणि संसाधने उपलब्ध असणाऱ्या समूहामध्ये निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प स्थापित करण्यात येतील.

**g)** लेदर प्रोसेसिंग हब, पादत्राणे उत्पादक समूह व लेदर आधारित उद्योग घटकांच्या उत्कृष्ट परिसंस्था असलेल्या जिल्ह्यांच्या ठिकाणी निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प स्थापित करण्यात येतील.

**h)** औषधी आणि रासायनिक समूह ज्यामध्ये सहाय्यभूत परिसंस्था विकसीत झालेली आहे अशा ठिकाणी निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प स्थापित करण्यात येतील.

**i)** ऑटो आणि इंजिनिअरिंग हब, फाउंड्री आणि इंजिनिअरिंग क्लस्टर यासारख्या मूलभूत परिसंस्था विकसीत असणाऱ्या ठिकाणी ऑटो आणि हायटेक इंजिनिअरिंग आधारीत निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प स्थापित करण्यात येतील.

### ४.२ निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रमाची (EoIDP) वैशिष्ट्ये :-

जागतिक दर्जाची व अत्याधुनिक पायाभूत सुविधा असलेली तसेच निर्यातवृध्दी, रोजगारनिर्मिती आणि देशांतर्गत तसेच परकीय गुंतवणूकीला पोषक असणारे प्रकल्प राज्यात विकसीत करणे हे निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रमाचे प्रमुख वैशिष्ठ्य असणार आहे. सदर कार्यक्रमांतर्गत पात्र असणाऱ्या घटकांची यादी पुढीलप्रमाणे आहे :-

**a)** मूलभूत पायाभूत सुविधा जसे की, रस्ते, वीज, पाणी इत्यादी.

**b)** सहाय्यभूत पायाभूत सुविधा जसे की कॉमन एफ्लुएंट ट्रीटमेंट प्लांट (सीईटीपी), कोल्ड स्टोरेज, वेअर-हाऊस सुविधा, कौशल्य आणि उबवण (Incubation) केंद्र, सामान्य पुनर्वापर/संसाधन पुनर्प्राप्ती सुविधा, हाय-स्पीड दूरसंचार आणि इंटरनेट सुविधा, डिजिटल पायाभूत सुविधा, प्लग-एन-प्ले सुविधा, फ्लॅटेड फॅक्टरी कॉम्प्लेक्स, सुरक्षा आणि आपत्ती जोखीम कमी करणारी उपकरणे, व्यापार समर्थन पायाभूत सुविधा, शेतकरी उत्पादक संस्था (FPO)साठी निर्यात प्रोत्साहन सुविधा जसे की प्रक्रिया, स्टोरेज (कोल्ड चेन), पॅक हाऊस इ.

**c)** एकात्मिक विकिरण पायाभूत सुविधा (Integrated Irradiation Infrastructure), नाशवंत कृषी उत्पादनांची आयुर्मान वाढवणारी उच्च तंत्रज्ञानावर आधारित सुविधा. त्यामध्ये प्रामुख्याने नाशवंत कृषी उत्पादनांची नासाडी रोखून त्यांचे आयुर्मान वाढवणा-या तसेच त्यांचा मूळ दर्जा कायम ठेवणा-या सर्व नियंत्रित विकिरण ऊर्जेवर आधारीत प्रक्रियांचा समावेश असणार आहे. याचा निर्यातवृद्धीसाठी फायदा होणार आहे.

**d)** जागतिक स्पर्धात्मकता आणि उत्पादन मानकांचा विकास साध्य करण्यासाठी गुणवत्ता मानके: निर्यात करणाऱ्या देशांच्या मानकांची पूर्तता करण्यासाठी गुणवत्ता आणि चाचणी सुविधा, R&D सुविधा.

**e)** पॅकेजिंग आणि डिझाइनिंग सुविधा.

**f)** हरित उपक्रम जसे की, सामायिक नवीकरणीय ऊर्जा निर्मिती (सौर, वारा, जैव), ऊर्जा व्यवस्थापन उपकरणे, जल संवर्धन, भौतिक कचरा कमी करणे आणि कचऱ्याचे पुनर्वापर, औद्योगिक क्षेत्रातील जैवविघटनक्षम कचऱ्याची विल्हेवाट आणि शाश्वत हाताळणी, कार्बन व्यवस्थापन इ.

**g)** कनेक्टेड इन्फ्रास्ट्रक्चर जसे की वाहतूक आणि लॉजिस्टिक सुविधा, कंटेनर हाताळणी सुविधा जसे कंटेनर फ्रेट स्टेशन (CFS), महामार्ग कनेक्टिव्हिटी इ.

**h)** लास्ट माईल आणि फर्स्ट माईल कनेक्टिव्हिटी, गरज आधारित पायाभूत सुविधा पूर्ण करण्यासाठी आवश्यक प्रकल्प घटक.

**i)** वरील पात्र कामांच्या व्याप्ती व्यतिरिक्त विशिष्ट क्षेत्रातील प्रकल्पाच्या आवश्यकतेनुसार पायाभूत सुविधांचा समावेश करण्याचे अधिकार प्रदत्त समिती (EC) कडे असतील.

(**टीप:** वर नमूद केलेली सूचक यादी निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रमाचा एक भाग म्हणून वाचावीत.)

## ४.३ निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रमांतर्गत (EoIDP) राबविण्यात येणा-या प्रकल्पांचे प्रकार:-

अत्याधुनिक तसेच सामायिक सुविधांनी युक्त निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास प्रकल्प हे निर्यातक्षम घटकांसाठी तसेच सक्षम निर्यातदारांसाठी उपलब्ध होणार असून त्याचे पुढीलप्रमाणे दोन प्रकार असणार आहेत :-

I. निर्यातीभिमूख विशिष्ट प्रकल्प (EoSP - Export oriented Specific Project)

II. निर्यातीभिमूख औद्योगिक उद्यान (EoIP - Export oriented Industrial Park)

### ४.३.१ निर्यातीभिमूख विशिष्ट प्रकल्प (EoSP - Export oriented Specific Project) :-

- निर्यात पायाभूत सुविधांशी संबंधित विशिष्ट उणिवा व अडचणी दूर करण्यासाठी विशिष्ट औद्योगिक समूह/ औद्योगिक क्षेत्र अंतर्गत सदर कामे मंजूर केली जातील.
- सदर कामे निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रमाच्या स्कोप ऑफ वर्क अंतर्गत निर्देशित सूचक यादीनुसार असतील.
- EoSP प्रकल्प हे विशिष्ट निर्यातक्षम क्षेत्रातील निर्यातवाढीकरीता प्रत्यक्षपणे जोडलेली असतील.
- EoSP प्रकल्प हे सार्वजनिक अथवा खाजगी संस्था यांच्या सहयोगाने PPP तत्त्वावर स्थापित करता येऊ शकतील.
- EoSP प्रकल्पांना पुढीलप्रमाणे नमूद झोननुसार प्रति प्रकल्प रुपये ५० कोटी अनुदान मर्यादेमध्ये राज्याचे आर्थिक सहाय्य करण्यात येईल.

| झोन | साप्रोयो-२०१९ नुसार तालुका/ झोन वर्गीकरण | मंजूर प्रकल्प किमतीनुसार राज्याचा आर्थिक सहभाग | शेरा |
|---|---|---|---|
| I | A & B | ४०% | • प्रकल्पविशिष्ट (Project specific) पायाभूत सुविधाविषयक निर्यात प्रोत्साहन कामांकरीता (interventions), सर्व झोनसाठी मंजूर प्रकल्प किमतीच्या रुपये ५० कोटीच्या मर्यादेत राज्य शासनाचे आर्थिक सहाय्य असेल.<br>• अंमलबजावणी संस्थेकडे जमीन उपलब्ध असणे आवश्यक आहे; प्रकल्प किमतीमध्ये जमिनीची किंमत विचारात घेतली जाणार नाही.<br>• इमारतीची किंमत (CFC, प्रशासकीय इमारत) एकूण प्रकल्प खर्चाच्या २५% पेक्षा जास्त नसावी. २५% पेक्षा जास्त खर्च अंमलबजावणी यंत्रणेद्वारे केला जाईल.<br>• धोरण कालावधीत प्रत्येक झोनमधून जास्तीत जास्त ०५ प्रकल्प म्हणजेच एकूण १५ प्रकल्पांना परवानगी देण्यात येईल.<br>• केंद्र शासनाची ASIDE योजना खंडीत झाल्यामुळे त्याअंतर्गत प्रस्तावित करण्यात आलेले तथापि प्रलंबित असलेले प्रकल्प सदर EoIDP कार्यक्रमांतर्गत पात्र असतील. |
| II | C, D, D+ | ५०% | |
| III | विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि धुळे, नक्षलग्रस्त प्रभावित क्षेत्र आणि आकांक्षित जिल्हे | ६०% | |

### ४.३.२ निर्यातीभिमूख औद्योगिक उद्यान (EoIP-Export oriented Industrial Park):-

- EoIP हे किमान १०० एकर सलग जमिनीवर स्थापित होणारे विशिष्ट उद्योगाशी संबंधित निर्यात प्रोत्साहन क्षेत्र असणार आहे. तसेच बंदर परिक्षेत्रामध्ये सदर प्रकल्पांकरीता किमान ५० एकर एवढ्या सलग जागेची आवश्यकता आहे.
- सदर प्रकल्प स्थापनेकरीता प्रकल्प गुंतवणूक किमान रुपये २०० कोटी एवढी राहणार असून बंदर परिक्षेत्रामधील प्रकल्पांकरीता किमान रुपये १०० कोटी एवढी गुंतवणूक राहणार आहे.
- सदर प्रकल्पाच्या क्षेत्रापैकी किमान २०% क्षेत्र हे सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम याकरीता MSME Zone

म्हणून राखीव ठेवण्यात येणार आहे.

- ज्या उद्योग घटकांचे मागील तीन वर्षातील निर्यात मूल्य एकूण उलाढालीच्या ५०% पेक्षा जास्त असेल अशा घटकांना (कृषी व ॲक्वा फूड क्षेत्राकरीता किमान ३०% निर्यात असलेल्या घटकांना) सदर प्रकल्पामध्ये उद्योग स्थापनेसाठी प्राधान्याने जागा उपलब्ध करून दिली जाईल.
- सदर प्रकल्पांची उभारणी राज्य शासन नियंत्रित यंत्रणा अथवा नामांकित खाजगी एकल संस्था अथवा सार्वजनिक - खाजगी भागीदारी तत्त्वावर (PPP) यांच्यामार्फत करता येणार आहे.
- महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१९ मधील तरतूदीनुसार EoIDP कार्यक्रमांतर्गत प्रस्तावित प्रकल्पांसाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे विशेष नियोजन प्राधिकरण राहणार आहे. काही प्रकल्पांच्या संदर्भात विशेष नियोजन प्राधिकरण वेगळे असल्यास महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून संबंधित प्राधिकरणाच्या विकास नियंत्रण नियमावलीस अनुसरुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून मान्यता देण्यात येईल. यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या विकास नियंत्रण नियमावलीमध्ये आवश्यक सुधारणा करण्यात येतील .
- महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून (MSRDC) समृध्दी महामार्गालगत २० औद्योगिक नोड उभारण्याचे नियोजित आहे. त्यानुसार समृद्धी महामार्गालगत किमान १० ठिकाणी EoIDP अंतर्गत प्रकल्प विकसीत करण्याकरीता MSRDC कडून किमान १०० एकर सलग भूखंड विनामूल्यरित्या/ संयुक्त उपक्रमाद्वारे (Joint Venture) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC) कडे हस्तांतरीत करण्यात येतील.
- सदर प्रकल्पांकरीता राज्य शासनाकडून एकूण मंजूर प्रकल्प किमतीच्या जास्तीत-जास्त रुपये १०० कोटीच्या मर्यादेत आर्थिक सहाय्य करण्यात येणार आहे.
- विशेष हेतू वाहन संस्थेद्वारा (SPV) सार्वजनिक -खाजगी भागीदारीअंतर्गत प्रस्तावित प्रकल्पांच्या बाबतीत प्रवर्तकामार्फत सदर प्रकल्प क्षेत्रामध्ये कमीतकमी एक निर्यातक्षम घटक अँकर युनिट म्हणून स्थापित करणे आवश्यक राहील. अँकर युनिटअंतर्गत किमान गुंतवणूक रुपये २० कोटी असावी व त्याअंतर्गत प्रकल्प प्रवर्तकांची भागीदारी किमान १०% असणे आवश्यक राहील.
- सदर प्रकल्प प्राधान्याने समृद्धी महामार्ग, प्रमुख एक्सप्रेस मार्ग, महामार्ग, इंडस्ट्रियल कॉरिडॉर, DMIC, बंदरे, विमानतळ, रेल्वे जंक्शन्स यांच्या परिक्षेत्रात स्थापित करण्यात येतील. त्यामुळे किमान लॉजिस्टिक खर्च आणि कार्गोची जलद वाहतूक करणे शक्य होणार आहे.
- सदर प्रकल्पामध्ये अखंडित औद्योगिक/व्यवसाय प्रक्रियांसाठी एकाच ठिकाणी एकात्मिक स्वरूपात विविध पुढील पायाभूत सुविधा उपलब्ध असतील.

    i. **सामायिक पायाभूत आणि लॉजिस्टिक सुविधा** :- EoIDP अंतर्गत प्रस्तावित प्रकल्पांचा उद्देश निर्यात संबंधित सामायिक शेअरिंग पायाभूत सुविधा विकसित करणे आहे. या अंतर्गत रस्ते, वीज पुरवठा, पाणीपुरवठा, ड्रेनेज, शीतग्रहे, एकात्मिक विकीरण सुविधा, पॅकेजिंग युनिट्स, चाचणी प्रयोगशाळा, सामान्य सांडपाणी प्रक्रिया संयंत्रे, निर्यात प्रोत्साहनासाठी आवश्यक असलेल्या इतर सुविधा आणि विशिष्ट औद्योगिक क्षेत्राच्या आवश्यकतेनुसार सुविधा, पुनर्वापर आणि विल्हेवाट लावण्यासह कचरा व्यवस्थापन हाताळण्यासाठी पुरेशा पायाभूत सुविधादेखील उपलब्ध असतील.MS-EPZ लॉजिस्टिक ऑपरेशन्स व्यवस्थित करण्यासाठी एकात्मिक लॉजिस्टिक सुविधांचा समावेश करेल आणि निर्यात मालाच्या कार्यक्षम हाताळणीसाठी, सुलभता देण्यासाठी गोदामे, शीतग्रहे, कंटेनर, यार्ड आणि वाहतूक सेवा यावरील घटकांचा खर्च कमी करेल.

ii. **तंत्रज्ञान आणि दळणवळण पायाभूत सुविधा** : विश्वसनीय, गतिमान आणि आधुनिक तंत्रज्ञान आणि दळणवळणाच्या पायाभूत सुविधांची उपलब्धता ज्यात उच्च गतीची इंटरनेट कनेक्टिव्हिटी, दूरसंचार नेटवर्क आणि डेटा केंद्रे यांचा समावेश राहील, जेणेकरून आंतरराष्ट्रीय भागीदारांसमवेत सुलभ समन्वय, संपर्क आणि माहितीची देवाण-घेवाण सुलभतेने करणे शक्य होईल.

iii. **वाहतूक पायाभूत सुविधा** : पायाभूत पूल आणि वाहतूक व्यवस्था विकसित करून निर्यात क्षेत्रात मालाची कार्यक्षम वाहतूक होईल या दृष्टीने सुविधा निर्माण करण्यात येतील. रेल्वे, विमानतळ, बंदरे यांच्यासाठी सुलभ दळणवळण करणे शक्य होईल.

iv. **औद्योगिक इमारती आणि गोदामे** : निर्यात क्षेत्रांमध्ये औद्योगिक इमारती आणि गोदामे उपलब्धता अथवा बांधण्यासाठी परवानगी दिली जाईल. निर्यातभिमुख उद्योगांना व्यवसायासाठी पूरक ठरणाऱ्या साठवणूक, बांधणी इ. सारख्या सुविधा उभारण्यासाठी मान्यता देण्यात येईल.

v. **बंदरे आणि टर्मिनल सुविधा** : निर्यात क्षेत्र एखाद्या बंदर किंवा नदी बंदर क्षेत्रात असल्यास निर्यात मालाची भरणी, उतरणी आणि साठवणूक करण्यासाठी कंटेनर टर्मिनल्स, मालवाहू सुविधा, स्टोरेज यार्डचे बांधकाम किंवा विस्तार याचा समावेश असेल.

vi. **व्यापार सहाय्य सेवा** : बँकिंग सुविधा, विमा प्रदाते, निर्यात दस्तऐवजीकरण केंद्रे, सीमाशुल्क दलाल आणि मालवाहतूक अग्रेषित करणाऱ्या व्यवसायांना त्यांच्या निर्यात करण्यामध्ये मदत करण्यासाठी सहाय्यक सेवांचा समावेश करण्यात येईल.

vii. **व्यवसाय सहाय्यता केंद्रे** : मार्केट रिसर्च, प्रशिक्षण, कन्सलटिंग/सल्ला सेवा, कौशल्यवृद्धी सेवा, वित्तीय सेवा, गुंतवणुकीच्या संधी यासारख्या सेवा पुरविण्यासाठी एक्सपोर्ट झोनमध्ये बिझनेस सहाय्यक केंद्र किंवा इंक्यूबेटर्सची स्थापना करता येईल.

viii. **सुविधा आणि सामाजिक पायाभूत सुविधा** : याअंतर्गत निवास सुविधा (वॉक-टू-वर्क), शाळा, प्राथमिक आरोग्य सेवा, मनोरंजन क्षेत्र आणि व्यापारी जागा यासारख्या सुविधा आणि सामाजिक पायाभूत सुविधा याद्वारे निर्यात क्षेत्रांमध्ये उच्च दर्जाचे वर्क कल्चर तयार होऊन उत्कृष्ट परिसंस्था निर्मितीस मदत मिळण्यासाठी प्रकल्प हाती घेता येतील. MS-EPZ परिसरामध्ये निवासासाठी प्रधानमंत्री आवास योजना यासारख्या योजनांची जोड देऊन कार्यरत असलेल्या कुशल आणि अकुशल कामगारांसाठी परवडणाऱ्या आणि सुरक्षित घरांचा पर्याय उपलब्ध करणेसाठी पूरक उपक्रम हाती घेता येऊ शकतील.

ix. **व्यावसायिक क्षेत्र** : राज्यशासनाच्या आयआयए (इंटिग्रेटेड इन्फ्रास्ट्रक्चर एरिया) अंतर्गत पात्र ठरू शकणाऱ्या कारणासाठी, व्यावसायिक कारणासाठी प्रस्तावित निर्यात प्रोत्साहन क्षेत्रात परवानगी दिली जाईल. IIA च्या नियमांनुसार IEPZ अंतर्गत व्यावसायिक कारणासाठी मर्यादित क्षेत्रावर परवानगी दिली जाईल.

x. **सुलभ नियमावली** : MS-EPZ अंतर्गत सर्व नियम प्रक्रिया या सुलभ व समर्पित राहण्यासाठी एकल खिडकी परवानगी यंत्रणा, विविध मंजूरी आणि परवान्यांसाठी ऑनलाइन सुविधा उपलब्ध असतील. निर्यात झोनमध्ये व्यवसाय स्थापित करणे आणि कार्यरत ठेवणे यामुळे अधिक सुलभ होईल. IEPZ च्या परिसरात कस्टम क्लिअरन्स सुविधा असतील, ज्यामुळे आंतरराष्ट्रीय व्यापाराला समर्थन, सहाय्य आणि सुविधा देण्यासाठी जलद प्रक्रिया उपलब्ध राहतील. सीमाशुल्क, गोदामे, तपासणी क्षेत्रे आणि सीमा शुल्क कार्यालये यांचा या अंतर्गत समावेश राहील.

- EoIDP अंतर्गत प्रकल्पांना पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे राज्याचे आर्थिक सहाय्य करण्यात येईल.

| झोन | साप्रोयो-२०१९ नुसार तालुका/ झोन वर्गीकरण | मंजूर प्रकल्प किमतीनुसार राज्याचा आर्थिक सहभाग | शेरा |
|---|---|---|---|
| I | A & B | ४०% | • EoIP प्रकल्पासाठी सलग १०० एकर क्षेत्र किंवा बंदर परिक्षेत्राकरीता कमीत कमी ५० एकर क्षेत्र आवश्यक असणार.<br>• एकात्मिक सुविधांमध्ये एकाच ठिकाणी अत्याधुनिक मूलभूत औद्योगिक पायाभूत सुविधा, सहाय्यभूत पायाभूत सुविधा, निर्यात सुकरता पायाभूत सुविधा, सामाजिक पायाभूत सुविधा आणि सामायिक सुविधा यांचा समावेश असेल.<br>• सदर प्रकल्पांकरीता राज्य शासनाकडून एकूण मंजूर प्रकल्प किमतीच्या जास्तीत-जास्त रुपये १०० कोटीच्या मर्यादेत आर्थिक सहाय्य करण्यात येणार आहे.<br>• अंमलबजावणी संस्थेकडे जमीन उपलब्ध असणे आवश्यक आहे; प्रकल्प किमतीमध्ये जमिनीची किंमत विचारात घेतली जाणार नाही.<br>• इमारतीची किंमत (CFC, प्रशासकीय इमारत) एकूण प्रकल्प खर्चाच्या २५% पेक्षा जास्त नसावी. २५% पेक्षा जास्त खर्च अंमलबजावणी यंत्रणेद्वारे केला जाईल.<br>• धोरण कालावधीत प्रत्येक झोनमधून जास्तीत जास्त ०५ प्रकल्प म्हणजेच एकूण १५ प्रकल्पांना परवानगी देण्यात येईल. |
| II | C, D, D+ | ५०% | |
| III | विदर्भ, मराठवाडा, रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि धुळे, नक्षलग्रस्त प्रभावित क्षेत्र आणि आकांक्षित जिल्हे | ६०% | |

**४.३.३** निर्यात प्रोत्साहनाकरीता पूरक ठरणारी तसेच राज्य शासनाकडून यापूर्वी जाहीर करण्यात आलेल्या लॉजिस्टिक्स धोरण, माहिती तंत्रज्ञान धोरण, ग्रीन हायड्रोजन धोरण, सागरी विकास धोरण, वस्त्रोद्योग धोरण इत्यादी धोरणांचा महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरणांतर्गत नमूद निर्यातीभिमूख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रम राबविण्याकरीता पुरेपूर फायदा घेण्यात येईल.

**४.३.४ पात्र यंत्रणा** :-

EoIDP कार्यक्रमांतर्गत नमूद EoSP आणि EoIP प्रकल्पांना आर्थिक सहाय्यासाठी तसेच अंमलबजावणी संस्था म्हणून खालील संस्था पात्र समजण्यात येतील :-

**i)** राज्य शासनाचे सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम.

**ii)** राज्य शासनाच्या इतर यंत्रणा.

**iii)** निर्यात प्रोत्साहन परिषदा अथवा कमोडिटी बोर्ड

**iv)** भारत सरकारच्या EXIM धोरणाअंतर्गत मान्यताप्राप्त शिखर व्यापार संस्था आणि या उद्देशासाठी प्रदत्त समितीद्वारे मान्यताप्राप्त झालेल्या इतर शिखर संस्था.

**v)** खाजगी उद्योग घटक/ औद्योगिक संस्था/ औद्योगिक संघटना यांना स्वतंत्रपणे वा सार्वजनिक-खाजगी भागीदारी तत्त्वावर (PPP) प्रकल्प उभारणी प्रस्ताव सादर करता येऊ शकतील. यासाठी प्रकल्प प्रवर्तकांनी निर्यात केंद्रीत प्रकल्प रुपरेषा, अनुषंगिक आकडेवारी, निर्यात जोडणी विषयक कागदपत्रे तसेच संबंधित निर्यात प्रोत्साहन परिषद (EPC) अथवा FIEO (Federation of Export Organizations) यांच्या अभिप्रायासहीत प्रस्ताव सादर करणे आवश्यक राहील. सदर प्रस्तावावर प्रकल्प प्रवर्तक संस्थेस अंमलबजावणी संस्था म्हणून मान्यता देण्याचे अधिकार प्रदत समितीस राहतील.

**vi)** असाईड योजनेंतर्गत स्थापित राज्यस्तरीय निर्यात प्रचालन समितीसमोर (SLEPC) यापूर्वी विचारार्थ ठेवण्यात आलेले तथापि सदर योजना delink झाल्याने निर्णय होऊ न शकलेल्या प्रकल्पांच्या अंमलबजावणी संस्था.

**vii)** वरीलपैकी कोणत्याही शासकीय यंत्रणांचे असे संयुक्त उपक्रम, जेथे त्यांची भागीदारी जास्त आहे, हे ही पात्र असतील.

**४.३.५ अंमलबजावणी संस्थेची (Impelementing Agency - IA) भूमिका**

EoIDP कार्यक्रमांतर्गत स्थापित केलेल्या सुविधांची मालकी ही योजनेसाठी प्राधिकृत केलेल्या अंमलबजावणी संस्थेची असेल. अंमलबजावणी संस्था प्रकल्पाच्या दैनंदिन कामकाजासाठी आणि देखभालीसाठी जबाबदार असतील. अंमलबजावणी संस्था नियोजित प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करून नोडल ऑफिसर (विकास आयुक्त, उद्योग) यांना आवश्यक कागदपत्रे, वैधानिक मान्यता, मंजुरी, पर्यावरणीय अनुपालनांसह नियोजित आराखड्यासहित सादर करतील. अंमलबजावणी संस्था (IA) प्रकल्पाच्या पूर्णत्वास आणि तेथे राबविण्यात येणारे ऑपरेशन्स यांच्या संपूर्ण व्यवस्थापनासाठी जबाबदार असेल.

सविस्तर प्रकल्प अहवाल हा शाश्वत प्रकल्प म्हणून पात्र ठरण्यासाठी अहवालामध्ये निर्यातीच्या अंतर्गत असणाऱ्या अडचणी, स्थानिक क्षेत्रातील संधी व क्षमता, निर्यातीसाठीच्या अडचणी वरील संभाव्य उपाय, राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय मापदंड (बेंचमार्क), संलग्न आकडेवारी व स्थानिक परिस्थिती जसे की,मानव संसाधन, नैसर्गिक संसाधने, कच्चामाल, संसाधन संस्था, शैक्षणिक, तांत्रिक व संशोधन संस्था,रेल्वे,रस्ते,विमानतळ,जलमार्ग यांची भौगोलिक जोडणी आणि जागतिक पुरवठा साखळी यांचा समावेश असेल. अहवालामध्ये निर्यात कामगिरी, रोजगार निर्मिती आणि गुंतवणूक आकर्षित करता येण्याजोग्या परिणामांचे स्पष्टपणे मूल्यांकन केलेले असेल.

वस्तू, उपकरणे आणि सेवांची सर्व खरेदी पारदर्शक आणि स्पर्धात्मक प्रक्रियेद्वारे प्रचलित शासकीय खरेदी प्रक्रिया नियमानुसार केली जाईल. अंमलबजावणी संस्था अनुदानाचा योग्य व निर्देशित कारणासाठीच वापर करेल. यातंर्गत काही उल्लंघन आढळल्यास अनुदानाची ही संपूर्ण रक्कम १०% वार्षिक दराने व्याजासह परत करण्यास अंमलबजावणी संस्था जबाबदार असेल. अंमलबजावणी करणारी संस्था प्रकल्पासाठीची प्रस्तावीत केलेली जमीन ही स्पष्ट शीर्षक व बोजामुक्त असल्याचे हमीपत्र देईल. त्या पुष्ट्यर्थ आवश्यक कागदपत्रे/ प्रमाणपत्रे सविस्तर प्रकल्प अहवालासोबत सादर करतील.

**४.३.६ प्रकल्प प्रस्ताव सादर करण्याची प्रक्रिया :-**

प्रकल्प प्रस्ताव हा सविस्तर व अचूक असावा. त्यामध्ये प्रकल्पांशी संबंधित सर्व माहिती, सर्वेक्षण आणि भविष्यातील अंदाज नमूद असले पाहिजेत. प्रकल्पामध्ये निर्यात पायाभूत सुविधांमध्ये असणाऱ्या कमतरतांचा स्पष्ट उल्लेख असावा, जेणेकरून त्यांची पुर्तता करण्यात येईल. पायाभूत सुविधांमध्ये असणाऱ्या उणिवा,ज्यांची पुर्तता करणे प्रस्तावित आहे. तसेच निर्यातीदरम्यान होणारे नुकसान,पायाभूत सुविधामध्ये असणाऱ्या कमतरतांमुळे गमावलेली संधी यांसह निर्यातीतील जोडणीचा स्पष्ट उल्लेख असावा. निर्यातीतील अपेक्षित वाढ, लॉजिस्टिक खर्चात घट, पर्यावरण संरक्षण, दर्जेदार रोजगार संधी इ. यासारखे मोजता येण्याजोगे परिणाम प्रकल्प प्रस्तावात स्पष्टपणे नमूद केले पाहिजेत. प्रकल्पाच्या व्यवहार्यतेसाठी देखभाल आणि दुरूस्ती मधील यंत्रणा, वापरकर्ता शुल्क आकारणे हे प्रकल्प घटकांचे मूल्यांकन करण्यासाठी मुख्य मापदंड असतील.

**प्रकल्प प्रस्तावामध्ये कार्यकारी सारांशासह खालील तथ्ये असावीत**

i. प्रस्ताव सादर करणाऱ्या संस्थेची नाव आणि संपूर्ण पत्ता.
ii. प्रवर्तक संस्थेचा नाव आणि संपूर्ण पत्ता.
iii. प्रवर्तक संस्थेचा प्रकार (व्यापारी संस्था इत्यादी/शासकीय यंत्रणा)
iv. प्रकल्पाची एकूण किंमत
v. वित्तीय तपशील
vi. वित्तीय स्त्रोताचे प्रकार कसा आहे
vii. प्रकल्पासाठी आवश्यक असलेली जमीन उपलब्ध आहे की नाही
viii. प्रकल्पाचा टप्पा आणि पूर्ण होण्याची तारीख

ix. कामाची व्याप्ती (आवश्यक सुविधांचा प्रकार)

x. प्रकल्पातून मिळणारे मुख्य फायदे

**४.३.७ प्रकल्पांची छाननी, देखरेख, मूल्यमापन आणि मंजुरीसाठी समित्या :-**

- EoIDP कार्यक्रमांतर्गत प्रकल्प प्रवर्तक संस्थेकडून नियोजित प्रकल्पाचा DPR प्रस्ताव सर्व आवश्यक तपशील आणि परिपूर्ण सविस्तर तपशीलासह राज्याचे निर्यात आयुक्त तथा विकास आयुक्त (उद्योग) यांना सादर करतील. सदर प्रकल्पांसाठी निर्यात आयुक्त तथा विकास आयुक्त (उद्योग) हे नोडल अधिकारी म्हणून कामकाज पाहतील.
- EoIDP कार्यक्रमांतर्गत प्रकल्पांची छाननी तसेच व्यवहार्यता तपासणी (Techno-Economic Viability) करण्याकरीता नोडल अधिकाऱ्यांना सहाय्य करण्यासाठी प्रकल्प सल्लागार (PC) यांची नियुक्ती उद्योग विभागामार्फत केली जाईल.
- उद्योग संचालनालयाकडून सदर प्रकल्प प्रस्तावांची प्राथमिक छाननी होवून परिपूर्ण प्रकल्प अहवाल प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प सनियंत्रण समितीकडे (PMC) सादर होणेसाठी कार्यवाही करण्यात येईल.
- प्रकल्पांच्या सुलभ व प्रभावी अंमलबजावणीसाठी राज्यस्तरावर खालील प्रमाणे नमूद दोन समित्या स्थापन केल्या जातील.

**(अ) प्रकल्प सनियंत्रण समिती (Project Monitoring Committee-PMC):-**

- प्रधान सचिव (उद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प सनियंत्रण समिती स्थापित करण्यात येईल.
- प्रकल्प सनियंत्रण समितीद्वारा प्रकल्पांचे, सादर प्रस्तावांचे विश्लेषण करून अंतिम मंजूरीसाठी प्रदत्त समितीकडे (EC) शिफारस करण्यात येईल.
- प्रकल्प सनियंत्रण समितीमध्ये वित्त विभाग, नियोजन विभाग, नगरविकास विभाग, महसूल विभाग, कृषी विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच MIDC, SICOM, MSRDC, MMB, नामांकित वित्तीय संस्था, एक्सपोर्ट प्रमोशन कौन्सिलचे सदस्य, DGFT इत्यादींचा समावेश असेल.

**(ब) प्रदत्त समिती (Empowered Committee-EC):-**

- मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली प्रदत्त समितीला प्रकल्प सनियंत्रण समितीने (PMC) शिफारस केलेल्या प्रकल्पांमध्ये आवश्यकतेनुसार सुधारणा करण्याचे तसेच मंजुरी देण्याचे अंतिम अधिकार असतील.
- असाईड योजनेंतर्गत स्थापित राज्यस्तरीय निर्यात प्रचालन समितीसमोर (SLEPC) यापूर्वी विचारार्थ ठेवण्यात आलेले तथापि सदर योजना delink झाल्याने निर्णय होऊ न शकलेले प्रकल्पास मंजूरी देण्याचे अधिकार या समितीस असतील.
- प्रदत्त समितीकडे प्रकल्पांकरीता अंतिम मंजूरी, प्रकल्प मंजूरी किंमत, राज्य शासनाचे मंजूर अनुदान, प्रस्तावित प्रकल्पातील विविध घटक व त्यासाठीचे अनुदान, प्रकल्प पूर्ण होण्याचा कालावधी व इतर बदल ठरविण्याचे अधिकार असतील.
- सद्यस्थितीत केंद्र शासनाच्या PLI (Production Linked Incentives) योजनेंतर्गत एकूण १४ उद्योग संवर्ग निश्चित करण्यात आली आहेत. महाराष्ट्र राज्य निर्यात प्रोत्साहन धोरणामध्ये नमूद विशेष प्रोत्साहने देण्याकरीता सदर १४ उद्योग संवर्ग पात्र ठरविण्यात आली आहेत. सदर उद्योग संवर्गात बदल वा यामध्ये नवीन क्षेत्रांचा समावेश करण्याचे अधिकार मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील प्रदत्त समितीला असतील.
- प्रदत्त समितीमध्ये वित्त विभाग, नियोजन विभाग, उद्योग विभाग, वन विभाग, नगर विकास विभाग, महसूल विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, कृषी विभाग, परिवहन विभाग यांचेसह निर्यात

परिषदा, डीजीएफटी, सिडबी, लीड बँक, MIDC, MSRDC, एक्झिम बँक या संस्थांचे प्रतिनिधित्व असेल.

**४.३.८ निर्यांताभिमुख पायाभूत सुविधा विकास कार्यक्रमांतर्गत प्रकल्पांना निधी वाटप :-**

अंमलबजावणी करणारी यंत्रणेकडून त्यांचे कार्य विहित केलेल्या कार्यक्षेत्रामध्ये निकषांच्या आधारे करेल.राज्य शासनाद्वारे नामनिर्देशित केलेल्या नोडल संस्थेकडून आगाऊ पावती प्राप्त झाल्यावर अंमलबजावणी संस्थेला थेट निधी वितरीत केला जाईल. हा निधी संस्थेच्या स्वतंत्र समर्पित एस्क्रो बँक (ESCRO BANK ACCOUNT) खात्यात ठेवला जाईल, ज्याचे नियंत्रण उद्योग संचालनालयाद्वारे केले जाईल. या संदर्भात निधी वितरीत करताना यापूर्वीच्या वर्षामध्ये त्याकरीता वितरीत निधीपैकी अखर्चित असलेला निधी विचारात घेतला जाईल. सर्वसाधारण वित्तीय नियमावलीनुसार (GFR) विहित कालावधी संपल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील.

**४.३.९ निधीचे वितरण:-**

प्रकल्पांसाठी टप्प्याटप्प्याने निधी वितरित केला जाईल. अंमलबजावणी करणाऱ्या संस्थेसाठी निधीचे वितरण ३ टप्प्यात केले जाईल:-

जमीनीचा ताबा, प्रदूषण नियंत्रण आणि सक्षम प्राधिकरणाकडून नकाशे मंजूरी व अंमलबजावणी करणाऱ्या संस्थेद्वारे आर्थिक व्यवस्थेची खात्री केल्यानंतर ३०% आगाऊ निधी वितरित केला जाईल. पहिल्या हप्त्याचा (३०%) उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर आणि अंमलबजावणीच्या समाधानकारक प्रगतीची खात्री केल्यानंतर ५०% निधीचा हा दुसरा हफ्ता वितरित केला जाईल. तिसरा आणि शेवटचा हप्ता (२०%) प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर आणि अंतिम मंजुरी आदेशात दिलेल्या आवश्यक अटींचे पालन केल्यानंतर वितरित केला जाईल. निर्यांताभिमुख औद्योगिक उद्याने महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, इतर राज्य संस्था आणि सार्वजनिक खाजगी भागीदारी (PPP) (SPV) अंतर्गत खाजगी संस्थांद्वारे प्रस्तावित केले जाऊ शकतात.

**५. <u>निर्यातदार तसेच निर्यातक्षम घटकांसाठी दिली जाणारी विशेष प्रोत्साहने</u> :-**

कोविड-१९ संसर्गाच्या प्रादुर्भावामुळे प्रभावित राज्यातील आकांक्षित MSMEs तसेच निर्यातक्षम MSMEs उद्योग घटकांना नवसंजीवनी देऊन निर्यातीला चालना देण्याकरीता राज्य शासनाकडून पुढीलप्रमाणे नमूद विशेष प्रोत्साहने देऊन सहाय्य करण्यात येणार आहे.

**५.१ राज्यातील उत्पादन क्षेत्रातील MSMEs घटकांना निर्यातीकरीता प्रोत्साहने:-**

**a)** EoIDP अंतर्गत प्रकल्पामध्ये स्थापित उत्पादन क्षेत्रामधील निर्यातक्षम घटक तसेच EoIDP बाह्य प्रकल्पामध्ये स्थापित उत्पादन क्षेत्रामधील निर्यातक्षम घटकांना राज्य शासनाकडून विशेष प्रोत्साहने अनुज्ञेय असणार आहेत. या प्रोत्साहनांचा लाभ मिळण्याकरीता सदर उद्योग घटकाने त्यांच्या एकूण उलाढालीच्या कमीतकमी ५०% निर्यात केली पाहीजे. तसेच महिला/ SC/ ST/ कृषी व ॲक्वा फूड क्षेत्र या प्रवर्गातील उद्योग घटकाने त्यांच्या एकूण उलाढालीच्या कमीतकमी ३०% निर्यात केली पाहीजे. सदर प्रोत्साहने दिनांक ०१ एप्रिल, २०२३ पासून लागू राहतील.

**b)** केंद्र शासनाकडून PLI (Production Linked Incentives) योजनेंतर्गत निश्चित करण्यात आलेल्या १४ प्रकारच्या उद्योग संवर्गातील निर्यातक्षम MSMEs घटकांना पुढील तक्त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे व्याज अनुदान लागू राहणार आहे. सदर १४ उद्योग संवर्ग पुढीलप्रमाणे आहेत :-

i. Large Scale Electronics Manufacturing
ii. Key Starting Materials (KSMs)/ Drug Intermediaries (DIs) and Active Pharmaceuticals Ingredients(APIs)
iii. Manufacturing of Medical devices
iv. Electronic/ Technology Products

